**चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली बांबू संशोधन केंद्र व प्रशिक्षण केंद्रामध्ये कार्यशाळा इमारतीचे (Workshop Building) बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. वनबां-२०१६/प्र.क्र. ४३५/फ-९**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- २७ ऑक्टोबर, २०१६**

**वाचा :-** अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र. कक्ष-२४(३)/वअ/५७४/२०१५-१६, दिनांक ३.१०.२०१६ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली बांबू संशोधन केंद्र व प्रशिक्षण केंद्रामध्ये कार्यशाळा इमारतीचे (Workshop Building) बांधकामाच्या रू. १,९८,५१,०००/- रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली बांबू संशोधन केंद्र व प्रशिक्षण केंद्रामध्ये कार्यशाळा इमारतीचे (Workshop Building) बांधकामाच्या रू. १,९४,२२,४४२/- रकमेच्या बांधकाम अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने खालील अटीच्या अधीन राहून सहमती दर्शविली आहे :-

१. सदर अंदाजपत्रकातील काही बाबींसाठी दरसूचीबाह्य दर वापरण्यात आले आहे. तरी, काम प्रत्यक्ष हाती घेण्यापूर्वी सदर दरांना अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर यांची मंजूरी घेणे आवश्यक आहे.
२. प्रस्तुत अंदाजपत्रकासाठी वापरण्यात आलेले नकाशे खाजगी वास्तुशास्त्रज्ञांनी तयार केलेले आहेत. परंतु, काम करण्यापूर्वी सदर नकाशे उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, नागपूर यांचेकडून मंजूर करून घ्यावेत व त्यावर उपभोक्ता विभागाच्या प्रमुखांची स्वाक्षरी घेणे बंधनकारक राहील.

चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली बांबू संशोधन केंद्र व प्रशिक्षण केंद्रामध्ये कार्यशाळा इमारतीचे (Workshop Building) बांधकामाच्या रू. १,९४,२२,४४२/- रकमेच्या बांधकाम अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीच्या अधीन राहून, शासनाची प्रशासकीय मान्यता **(वित्तीय मान्यता वगळून)** देण्यात येत आहे. सदर बांधकामाची बाब सोबत जोडलेल्या प्रपत्राप्रमाणे आहे.

हे आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४५२/१५/इमा-३, दिनांक २६.१०.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२८१७०७५८७११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Kashinath Mahajan

Digitally signed by Prakash Kashinath Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Kashinath Mahajan
Date: 2016.10.28 17:11:50 +05'30'

**(प्रकाश महाजन)**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. मुख्य वनंसरक्षक (प्रा.), चंद्रपूर.
४. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत-३), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
८. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
९. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.(निवडनस्ती)